**"विविध कल्याणकारी योजनांमध्ये वस्तुस्वरूपात मिळणा-या लाभाचे हस्तांतर, रोख स्वरूपात थेट लाभार्थ्याच्या बँक खात्यात करणेबाबत."**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डिसीटी २३१६/प्र.क्र.१३३/का.१४१७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०५ डिसेंबर, २०१६.

**प्रस्तावना -**

शासनाद्वारे थेट लाभ हस्तांतरण (DBT) प्रक्रियेवर मोठ्या प्रमाणात भर देण्यात येत आहे. जेणेकरुन लाभार्थ्यांना योजनांचा पूर्णपणे लाभ मिळेल आणि अनावश्यक गोष्टी टळू शकतील. सद्यस्थितीत डीबीटी अंतर्गत अनेक योजना अंतर्भूत असून या सर्व योजनांमध्ये रोख रकमेच्या स्वरुपात अनुदान देण्यात येते. हे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक खात्यात थेट जमा होते. उदा. शिष्यवृत्ती, रोजगार हमी योजनेंतर्गत मिळणारे वेतन, पेन्शन योजना, घरगुती गॅसवरील अनुदान इ.

२. DBT कार्यक्रमाची व्याप्ती वाढविण्याची गरज आहे. DBT च्या दुसऱ्या प्रकारामध्ये शासनाच्या विविध कल्याणकारी योजनांमध्ये ज्या ठिकाणी शासनाद्वारे वस्तू स्वरुपात अनुदान देण्यात येत आहे, त्या ठिकाणी वस्तू स्वरुपात अनुदान देण्याऐवजी रोख रकमेच्या स्वरुपात अनुदान देण्यात यावे. या निर्णयाचा परिणाम सर्व प्रशासकीय विभागांच्या कल्याणकारी योजनांच्या कार्यपध्दतीवर होणार असल्याने धोरणात्मक निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या वस्तू कोणत्याही योजने अंतर्गत खरेदी करुन लाभार्थ्यांना वाटप / वितरीत करता येणार नाही.

सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मध्ये नवीन वस्तुंचा समावेश करण्याचे अधिकार मा. मुख्यमंत्री यांना राहतील.

हे धोरण शासनाच्या सर्व विभागांना (आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांसहित) , स्थानिक स्वराज्य संस्था, मंडळे व महामंडळे यांना लागू राहील.

२. शासकीय विभाग विभागांना (आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांसहित) / स्थानिक स्वराज्य संस्था / मंडळे / महामंडळे यांना जर कल्याणकारी योजनेअंतर्गत कोणतीही वस्तु / साधनसामग्री लाभार्थ्यांना द्यावयाची असल्यास त्यांनी खालील प्रमाणे कार्यपध्दती निश्चित करावी -

अ) संबंधित वस्तुबाबत वितरण योजना तयार करणे.
आ) वस्तु विकत घेण्यासाठी अनुदान ठरविणे.
इ) वितरीत करावयाच्या वस्तूंचे परिमाण (specification) ठरविणे.
ई) या योजनांतर्गत पात्रतेचे निकष ठरविण्यात यावे.
उ) पात्रतेप्रमाणे लाभार्थ्याची निवड करण्यात यावी.
ऊ) लाभार्थ्यांची यादी तयार करुन त्यांच्या आधार क्रमांकाशी जोडणी (Seeding) करणे.
ए) निवड केलेल्या पात्र लाभार्थ्यांच्या प्रकरणाला मान्यता देवून त्यांना लेखी कळविणे.
ऐ) लाभार्थ्यांनी परिमाणाप्रमाणे (specification) वस्तूंची खरेदी करणे.
ओ)संबंधित यंत्रणेने लाभार्थ्याने खरेदी केलेल्या वस्तुची व सादर केलेल्या पावतीची शहानिशा करून पूर्णपणे खातरजमा झाल्यावर लाभार्थ्याच्या बँक खात्यावर योजनेअंतर्गत सुनिश्चित

केलेल्या अनुदानाची रक्कम जमा करणे. वस्तुची शहानिशा कशा प्रकारे करावी व ती करणे आवश्यक आहे काय याबाबत संबंधित विभागाने निर्णय घ्यावा.

औ)लाभार्थ्यांना रोख रकमेच्या स्वरूपात अनुदान त्यांच्या आधार क्रमांकाशी निगडीत बँक खात्यात जमा करण्यात यावे.

३. विविध कल्याणकारी योजनांमध्ये ज्या ठिकाणी शासनाद्वारे वस्तू स्वरुपात अनुदान देण्यात येत आहे, त्या ठिकाणी वस्तू स्वरुपात अनुदान देण्याऐवजी रोख रकमेच्या स्वरुपात अनुदान दिल्यास खालील फायदे शक्य होतील.

१) विविध कल्याणकारी योजनामधून मिळणारे लाभ हे थेट लाभार्थ्यांनाच मिळण्याची पूर्ण शाश्वती राहील.

२) विविध विभागांद्वारे विभागांना (आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांसहित) होत असलेल्या विविध प्रकारची खरेदी टळू शकेल.

३) शासनामार्फत देण्यात येणा-या लाभांबाबत संबंधित लाभार्थ्यांची निवड करुन त्यांना वित्तीय सहायता वेळेवर देण्याची हमी शासनाची राहिल.

४) लाभार्थ्याला एक ठराविक व विशिष्ट रक्कम मिळणार असल्याने तो आवश्यक असणाऱ्या वस्तूची गुणवत्ता तपासून व भाव करुन चांगली वस्तु खरेदी करु शकेल, असे करताना लाभार्थी त्याला न आवडणारी वस्तु घेण्यास बांधील राहणार नाही.

५) स्थानिक पातळीवरच लाभार्थी वस्तु खरेदी करणार असल्याने स्थानिक उद्योग व्यावसायिकांना लाभ होईल.

६) रोख रकमेच्या स्वरूपात लाभ वाटप केल्यामुळे शासनाच्या कार्यपध्दतीत अधीक पारदर्शकता येईल व संख्यात्मक तसेच गुणात्मक वाढ होईल.

७) वस्तुंच्या खरेदी प्रकियेमुळे तसेच वस्तुच्या गुणवत्तेबाबत निर्माण होणा-या बाबी, अनियमितता याबाबत विधीमंडळ अधिवेशनात विविध आयुधान्वये उपस्थित होणारे प्रश्न, रोख स्वरूपात थेट लाभ देण्याच्या पारदर्शक प्रक्रियेमुळे टळू शकतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०५१५०९५१९७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55fdd77fa8877b50fd182206f763c590c30ce698809f79d37b145fd63e375059, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2016.12.05 15:12:09 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल , महाराष्ट्र राज्य , यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा.सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व)

६. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, (महाराष्ट्र-१/२), मुंबई/नागपूर.
७. मा. मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन, मंत्रालय , मुंबई
८. अपर मुख्य सचिव , नियोजन विभाग, मंत्रालय , मुंबई
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव सर्व मंत्रालयीन विभाग .
१०. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (पत्राने)
११. महासंचालक,युआयडी प्रादेशिक कार्यालय, सातवा मजला, एमटीएनएल बिल्डिंग, जी. डी. सोमानी मार्ग,कफ परेड, मुंबई -४०० ००५
१२. विभागीय आयुक्त, सर्व.
१३. जिल्हाधिकारी, सर्व
१४. व्यवस्थापक, जिल्हा अग्रणी बँक (सर्व)
१५. जिल्हा माहिती अधिकारी (सर्व)
१६. महाव्यवस्थापक, राज्य स्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र, केंद्रीय कार्यालय,लोकमंगल, १५०१, शिवाजीनगर, पुणे ०५.
१७. उप सचिव , नियोजन विभाग, (का. १४१७), मंत्रालय, मुंबई
१८. सह सचिव /उप सचिव / अवर सचिव, नियोजन विभाग , मंत्रालय , मुंबई
१६. निवडनस्ती, कार्यासन १४१७.

## परिशिष्ट अ

शासनाच्या विविध विभागामार्फत लाभार्थ्यांना वाटप करण्यात येणाऱ्या साधनसामुग्रीची यादी :-

१. जनावरांचे खादयवाटप
२. विजेवर चालणारे वैरण कापणी यंत्र / कडपा कटटी यंत्र
३. मासेमारीकरिता प्रगत यंत्रसामुग्री पुरविणे
४. कृषि औजारे पुरविणे
५. मायक्रो ट्रॅक्टर व त्याची उपसाधने
६. बियाणे लघु हत्यारे वितरण
७. मधपेटया यंत्र वाटप
८. गणवेश / साडी वाटप
९. सायकल वाटप
१०. पावर टिलर पुरविणे
११. गटई कामगारांना पत्र्याचे स्टॉल पुरविणे
१२. स्वयंपाकाचा गॅस व सौरकुकर
१३. सामुहिक विवाहाप्रसंगी वस्तु देणे.
१४. महिला बचत गटांना मोबाईल व्हॅन पुरविणे
१५. बियाणे पुरवठा / वाटप
१६. पिक संरक्षण उपकरणे
१७. कामगंध सापळे
१८. किटक नाशके
१९. पाईपलाईन
२०. ताडपत्री
२१. लघुअंडी उबविणारी यंत्रे
२२. मुरघास तयार करण्याची युनीट
२३. मासेमारी साधने
२४. कुक्कूटपालनाची शेड
२५. शेळया बकऱ्यांसाठी शेड
२६. कृषी पंप
२७. वीज पंप
२८. ऑईल इंजीन
२९. यांत्रिकीकरण संबंधी साहित्यपुरवठा
३०. पाठयपुस्तके
३१. गाईडस
३२. पिठाची गिरणी
३३. शिलाई मशीन
३४. चष्मा
३५. विद्यार्थ्यांना टॅब / लॅपटॉप वाटप
३६. मोबाईल फोन वाटप
३७. छत्री / रेनकोट
३८. कांडप यंत्र

३९. अपंग व्यक्तींना देण्यात येणारे साहित्य (श्रवण यंत्र / तीनचाकी सायकल / काठी इ.)
४०. पिको फॉल मशिन
४१. शाळेचे दप्तर (School Bag)
४२. पादत्राणे (Shoes)
४३. रोटाव्हेटर
४४. HDPE Pipe